मागील अध्यायातील सारांश म्हणजे मच्छिंद्रनाथ गोराक्षाला तपश्चर्येला बसविण्यासाठी हिमालयात घेऊन गेले. बाळ योगी गोराक्षाला तप करतांना काही ना काही अडचणी जाणवणार याची त्यांना काळजी वाटू लागली पण आदिनाथ श्रीशंकरांनी आश्वासन दिल्यामुळे त्यांना दिलासा वाटला आणि ते पुनश्च तीर्थाटनास निघाले. बारा वर्षांच्या प्रदीर्घ कालावधीनंतर रामेश्वरास पोहोचले. तिथे सेतुबंधावर मारुतीरायांचे दर्शन झाले. त्यांच्या आगमनाने मारुतीरायांना हर्ष झाला कारण मच्छिंद्राने त्यांना शब्द दिला होता की स्त्री राज्याची महाराणी मैनाकिनीला मारुतीरायांनी जे वचन दिले आहे, त्या वचनांतून मी तुम्हाला मुक्त करीन. मारुती आणि मच्छिंद्रनाथ स्त्री राज्यात आले, तिथे त्यांनी मच्छिंद्र आणि मैनाकिनीचे लग्न लावले आणि वचनमुक्त होऊन रामचिंतनासाठी रामेश्वरला परतले. मच्छिंद्रनाथ आणि मैनाकिनीला पुत्ररत्न झाले. त्याचे नाव मीननाथ. खरं तर मीननाथच्या रूपाने उपरिचर वसूंचे अंशरूप जन्माला आले. या व्यतिरिक्त हस्तीनापुर नगरीत बृहदेव राजाने आयोजित केलेल्या सोमयाग यज्ञामुळे अग्नी नारायण प्रसन्न झाले आणि प्रसाद रूपाने एक सुंदर आणि तेजस्वी बाळ यज्ञकुंडात उत्पन्न झाले. हे बालक म्हणजे जालिंदर! तारुण्यात जगत उत्पत्ती साठी करावा लागणारा उपभोग किळसवाणा आणि निच्च कृत्य वाटल्याने, विलासी राजऐश्वर्याचा त्याग करून जालिंदर कायमचा राजमहाल सोडून बाहेर निघून गेला. अरण्यात थकलेल्या जालिंदराला गाढ निद्रा लागली पण अरण्यात वणवा भडकल्याच्या निमित्ताने जालिंदरचे जनकजननी अग्नीनारायणाने त्याला ओळखले आणि स्वतःची ओळख सांगितली.

मध्यरात्र उलटून गेली आहे. अरण्यात महाभयंकर वणवा धडाडत आहे आणि अग्नीदेव जालिंदर हे पितापुत्र तेथे बोलत बसले आहेत. जालिंदरचे जन्म रहस्य सांगून अग्नीदेवाने विचारले, “वत्सा! आता तुझी काय मनोकामना आहे ते सांग.”

जालिंदर म्हणाला, “तातश्री! माझे मन कामनाविरहित आहे. मला कसलीही अपेक्षा वा कशाचाही लोभ नाही. योग्य आणि अयोग्य आपण जाणत आहात. या नरदेहाचे सार्थक व्हावे असे काहीतरी करावयाची माझी धारणा आहे. जन्माला आला आणि मेला असे माझे होऊ नये. जालिंदर जन्माला आला आहे परंतु मेलेला ऐकले नाही असे लोकांनी माझ्या बाबतीत म्हटले पाहिजे. अशी अजरामर किर्ती होऊन चिरंजिवीत्व प्राप्त होईल असे आपण माझ्यासाठी करावे.” वयाच्या मानाने पुत्राला चांगली उमज असल्याचे पाहून अग्नीदेवाने समाधानाने मान डोलाविली. क्षणभर विचार करून पुत्राला खांद्यावर घेऊन दत्ताश्रमात येऊन पोहोचले. अग्नीदेवाला पाहून श्रीदत्तात्रेयांना आनंद झाला. प्रेमालिंगनाने त्यांचे स्वागत करीत श्रीदत्तगुरु म्हणाले, “अग्नीमहाराज! आज अचानक आपली कृपा झाली. मनामध्ये काही अपेक्षा ठेवून आपण इथे आला असाल तर मला आपली सेवा करायची संधी द्यावी. आळशी माणसाला गंगा प्राप्त व्हावी, क्षुधपिडीताचे कामधेनुने दुग्धपानाने तुष्टीकरण करावे, किंवा अंधारात चाचपडत जाणाऱ्याला दीप मिळावा किंवा मृत्यूची चाहुल लागलेल्या दुर्दैवी जीवाला अमृतप्राप्ती झाल्यावर जसा आनंद होईल, तसे मला आपल्या भेटीने आनंद झाला आहे. अग्नीदेवा! मी आपली कोणती सेवा करू आणि आपल्यासोबत आलेला हा गोजिरवाणा कुमार कोण आहे हे पण सांगावे. अग्नीदेवाने जालिंदराचा जन्मापासून साधंत इतीहास कथन केला आणि म्हणाले, “श्री गुरुदत्ता! याला आपल्या चरणांवर वाहण्यासाठी आणला आहे. याला अनुग्रह देऊन सज्ञान करा. चिरंजीव करून किर्तिमान करावे. हा कुमार श्रीशिवाच्या वीर्यापासून माझ्या देहात जन्मलेला अंतरीक्षनारायण असल्याने तो मला आणि श्रीशिवाला दोघांना ही फार प्रिय आहे. याला जर आपला गुरु म्हणून वरदहस्त लाभला तर हा चिरंजीव होऊन यमालाही जिंकेल. बावनकशी

सोन्याला आपल्या सारख्या सुवर्णकारने घडविल्यास तो अलंकार कसा शोभायमान होईल. हा जन्मजात चंदन असून त्यावर आपण कस्तुरीचा सुगंध टाकल्यास ती चंदनाची उटी भाळी मिरविणे पवित्र मानले जाईल. सारांशात सांगावयाचे तर या अद्‌वितीय हिऱ्याला पैलू पडण्याची प्रार्थना आहे.

अग्नीदेवाच्या नम्रतेच्या आणि जालिंदरच्या भवितव्याच्या कळकळीने प्रसन्न होऊन श्रीगुरूदत्त म्हणाले, “मी याच क्षणी आपली मनोकामना पूर्ण करीत आहे पण याला बारा वर्षे माझ्याजवळ ठेवले पाहिजे.” अग्नीदेवाने क्षणार्धात होकार दिला आणि म्हणाले, “अवश्य! तथापि आता, या क्षणी माझ्या समोर ह्याच्या मस्तकावर वरदहस्त ठेवा, म्हणजे माझे समाधान होईल. त्यानंतर गुरुदत्तांनी जालिंदरला मांडीवर बसविले. कानात दिक्षामंत्रोच्चार केला. माथ्यावर वरदहस्त ठेवून अद्‌वैताचा बोध केला. मुळातच सुपीक असलेल्या भूमीत सकस बीजांची पेरणी झाल्यास अंकुरावयास कितीसा अवधी लागणार? जालिंदरचे अज्ञान दूर झाले. ब्रह्मप्राप्तीची विलक्षण अनुभूती जाणवली. देहाच्या आत बाहेर, सर्व चराचरांत एकच ब्रह्मचैतन्य जाणवू लागले. भेदाभेद लोप पावला. ज्ञान प्राप्त झाले. आपल्या अपेक्षेप्रमाणे सारे काही घडत आहे, या आनंदाने दत्तगुरूंना नमस्कार करून अग्नीदेव अंतर्धान पावले.

अल्प कालावधीत जालिंदर श्री दत्तगुरूचा लाडका झाला हता. गुरुदेव त्याला नित्य आपल्या समवेत वागवीत असत. रोज भागीरथीत स्नान करावे, विश्वेश्वराचे दर्शन घावे, कोल्हापुरात भिक्षा मागावी. पांचाळेश्वरी भोजन करावे आणि माहूर गडावर रेणुकामातेच्या मातापुरीत निद्रा असा दिनक्रम असे. जालिंदर मनापासून करीत असलेल्या गुरुसेवेमुळे श्रीदत्तांना फार आनंद होत असे. बारा वर्षांच्या कालावधीत त्यांनी जालिंदरला सर्व शास्त्रे शिकवली. अस्त्र विद्‌या आणि शास्त्रविद्‌यांमध्ये प्रवीण केले. सर्व देव देवतांना निमंत्रण देऊन त्यांचा आशीर्वाद मिळवून दिला. मग अग्नीदेवाला बोलावून श्रीदत्त म्हणाले, “अग्नीदेवा पुत्र सकल विद्‌या पारंगत झाला आहे. आता एक काम बाकी आहे. याला पृथ्वीवरील सर्व देवतांची स्थाने दाखवावी आणि मच्छिंद्राप्रमाणे नागश्वत्थ वृक्षाची आराधना करण्यास सांगावे. ज्यायोगे सर्व देवतांचे वशीकरण होईल. नंतर याला तपाचरणासाठी बसवावे. हे कार्य आपण स्वतः जातीने उपस्थित राहून पूर्ण करावे ही विनंती करीत आहे.

“आज्ञा प्रमाण आहे.” असे म्हणून अग्नीदेवाने पुत्र जालिंदराला खांद्‌यावर घेतले आणि पृथ्वीतलावरील सर्व देवतांच्या पवित्र स्थानांचे दर्शन घडविले. मार्तंड पर्वतावरील नागश्वत्थ वृक्ष दृश्यमान करून घेतले. नंतर लोखंडाच्या टोकदार खिळयावर पायाचा अंगठा टेकवून, वायुभक्षण करीत, आकाशी एकटक दृष्ठी ठवून ईश्वरस्मरण करीत बारा वर्षांची तपश्चर्या जालिंदरने पूर्ण केली. त्या उग्र तपश्चर्येच्या सांगतेसाठी ब्रह्मा, विष्णू, महेश यांच्यासह सर्व देव उपस्थित राहिले आणि त्यांनी शुभाशिर्वाद दिले. सर्व देव स्वतःच्या स्थानी परतल्यानंतर बद्रीनाथाने अग्नी आणि जालिंदर या पितापुत्रांना तीन दिवस आतिथ्यासाठी ठेवून घेतले. त्या कालावधीत श्रीबद्रीनाथाने दोघांना एक विलक्षण कथा ऐकविली, ती अशी:

सत्यलोकात ब्रह्मदेवाचा महालात एक विपरीत घटना घडली. तारुण्यात पदार्पण केलेली ब्रह्मदेवाची कन्या सरस्वतीने साज शृंगार केला होता. मुळातच ती लावण्याती आणि साज शृंगाराने तिचे रूप खुलले होते. त्या रूपसुंदर किशोरीने गळयात सुवर्णांचे, रत्नाचे अलंकार परिधान केले होते. तिच्या सौंदर्याचे काय वर्णन करावे! विपुल केशसंभार मुक्तपणे खांद्‌यावर रुळत होता. तेजस्वी चेहरा, सरळ नासिका, कुंदकळयांसारखी शुभ्र दंतपंक्ती, पुष्ट आणि उभार स्तन,

सिंहकटी आकर्षक डौलदार नितंब केळीच्या गाभ्यासारख्या मांड्या, निमुळत्या पोटऱ्या, कोमल चरण! एकूणच कामनीय देहावर तुरुण्याची किमयागिरी मोहात टाकणारी. दृष्टी पडताच पाहणाऱ्याची वासना चेतवणारी ती लावण्याची मूर्ती पाहून, स्वकन्येचे मादक रूप पाहून साक्षात ब्रह्मदेवच कामविफल झाले. वासनांध होऊन तो स्वकान्येला, सरस्वतीला धरण्यासाठी सरसावला. पित्याची ही अनपेक्षित कृती पाहून ती घाबरून सैरावैरा पळत सुटली. तिच्यामागे ब्रह्मदेवसुद्धा तिला धरण्यासाठी धावू लागला. धावता धावता कामवासना असहाय्य होऊन त्याचा वीर्यपात झाला. वाऱ्याच्या झोताने ते वीर्याचे थेंब पृथ्वीवर आले. हिमालयाच्या कुशीत एक महाकाय हत्ती निद्रिस्त होऊन पहुडला होता त्याचं कानात हे विर्यबिंदू पडले. स्वकन्येला पाहून कामवासनेने पछाडला म्हणून ब्रह्माची 'अब्रह्म' म्हणून दुष्कीर्ती झाली.

श्रीशंकर पुढे सांगू लागले, या घटनेला प्रदीर्घ कालावधी झाला आहे. त्या हत्तीच्या कानातील वीर्यबिंदूमध्ये प्रबुद्ध नारायणाने देहधारणा केली आहे. अद्याप ते बालक हत्तीच्या कानातील पोकळीत असून आता मोठा झाला असेल. त्या अवतारी बालकाला जालिंदराने प्रत्यक्षात आणावे आणि शिष्य करावे. स्वतःप्रमाणे विद्याविभूषीत करावे. कानातून जन्मला म्हणून त्याचे 'कानिफ' असे नामकरण करून कीर्ती वाढवावी.

श्रीशिवाने सांगितलेली घटना आणि त्यामागील उद्धेश लक्षात घेऊन अग्नीदेव म्हणाले, "महाराज आपण अपूर्व आणि अदभूत घटना ऐकवलीत. आता तो गजराज कोठे आहे ते दाखवण्याची कृपा करावी. आजपर्यंत माझा पुत्र जालिंदर एकटाच होता, आता त्याला 'कानिफा' ची साथ सोबत मिळेल. आता आपण तातडीने आम्हाला त्या हत्तीकडे घेऊन चला!"

"अवश्य!" असे म्हणत श्रीशिव, अग्नीदेव आणि जालिंदरास घेऊन निघाले. त्यांच्या दिव्यत्वाने नभोमंडळ प्रकाशमय झाले. सूर्य, चंद्र, अग्नी एकाचवेळी प्रकटल्याचा भास झाला. रुद्र, विष्णू, ब्रह्म किंवा शुक, बृहस्पती, कच यांच्या त्रीकुटांप्रमाणे ते तिघे वाटत होते. हिमालयाच्या घनदाट अरण्यातील त्या महकाय गजराजाच्या समीप ते आले. महदेव म्हणाले, "हा गजराज, महाशक्तिशाली आहे आणि महापराक्रमी आहे, आपला सुगावा लागताच हा गोंधळ करील, याला युक्तीप्रयुक्तीने स्थिर आणि शांत उभा केला पाहिजे,"

यावर जालिंदर आत्मविश्वासाने म्हणाला, "आदिनाथा! मला श्रीदत्तगुरूंचा वरदहस्त लाभला आहे, त्याचा चमत्कार तरी पहा. ब्रह्मांडालाही जिंकण्याची, कृतांत काळलाही नमविण्याची, वायुला थोपविण्याची, सूर्यरथाला रोखण्याची ताकद असणारी विद्या असल्याने या गजराजाचे भय बाळगण्याचे कारण नाही. आपण स्वतःच्या दृष्टीसमोर काय घडते ते प्रत्येक्षच बघा." असे म्हणून जालिंदराने भस्मझोळीतून भस्म काढून त्यावर मोहनास्त्र मंत्रले आणि त्या पाठोपाठ स्पर्शास्त्र जपून भस्माची चिमुट हत्तीवर सोडली. त्या स्पर्शास्त्राच्या प्रभावाने हत्ती एका जागी स्थिर झाला आणि मोहनास्त्राच्या प्रभावाने शांत झाला.

जालिंदर म्हणाला, "आपण उभयता इथेच थांबा, मी कानिफाला घेऊन येतो." जालिंदर त्वरेने हत्ती समीप पोहोचले आणि त्याच्या कानाजवळ जाऊन प्रेमादराने हाक मारीत म्हणाले, "हे प्रबुद्धनारायणा! आपण सामर्थ्यशाली आणि धैर्यवानही आहात. आपण या हत्तीच्या कानात देहधारणा केली असल्यास, आता विलंब न लावता कानातून बाहेर यावे. आम्ही आपले 'कर्ण कानिफा' असे नामकरण करीत आहोत प्रबुद्ध महाराज त्वरित प्रकट व्हावे."

त्या महाकाय गजराजाच्या कानातून प्रतिसाद आला, “गुरुदेव! क्षणभर थांबा मी त्वरित आलो” असे म्हणून कानिफाने कानाच्या द्वाराशी येऊन गुरूंना वंदन केले. जालिंदराने आपल्या हाताचा आधार देऊन त्याला उतरवून घेतले. षोडषवर्षीय देखण्या, तेजस्वी, तपस्वी युवकाच्या देहप्रकाशाने अरण्यात प्रकाश पसरला. त्याला खांद्यावर घेऊन श्रीशिव आणि अग्नीदेवासमीप खाली उतरवून जालिंदर म्हणाले, “कानिफा! या आदिनाथांना, तसेच तुझे आजोबा अग्नीदेव यांना नमस्कार कर.” कानिफाने भक्तीभावाने उभयतांना वंदन केले. श्रीशिवाने ममतेने कानिफाला आपल्या मांडीवर बसविले. त्याला प्रेमाने कुरवाळीत म्हणाले, “अग्नीपुत्र जालिंदरा! याला अनुग्रह दे. जसा सूर्यदय होताच अंधःकार दूर होतो, त्याचप्रमाणे गुरु अनुग्रह झाल्यावर याचे अज्ञान दूर होईल.” महादेवांचा शब्द प्रमाण मानून सर्वकार्य सिद्धीसाठी ईश्वराचे चिंतन केले आणि तन, मन, धन, वाचा, चित्त एकजीव करून स्वतःच्या गुरुचे स्मरण करून वंदन केले. मग कानिफाला अनुग्रह देऊन सज्ञान केले. त्याच्या माथ्यावर वरदहस्त ठेवला. कांत गुरुमंत्र सांगितला. दिवा लागताच अंधार नष्ट होतो, तशीच अनुभूती कानिफाला आली. सर्व चराचरात मी आणि माझ्यात चराचर भरले असल्याचा साक्षात्कार झाला. गुरु, ब्रह्म, हरी, रुद्र सर्वांचे एकाच चैतन्यरूप असल्याचे भासले ब्रह्मचैतन्याचीच अनुभूती आली.

मग श्रीशिव, अग्नीदेव, जालिंदर आणि कानिफा हे बद्रिकाश्रमात परत आले. एक दिवस अग्नीदेव जालिंदरास म्हणाले, “वत्सा जालिंदरा! श्रीदत्तगुरूंनी तुला दिलेली ज्ञानसंपत्ती कानिफाला दान करून त्यालाही ज्ञानी कर.” असे सांगून सर्वांचा निरोप घेऊन स्वस्थानी गेले. तथापि श्रीशिवांनी सहा महिने प्रकट रुपात राहून जालिंदराच्या माध्यमातून कानिफाचा विद्याभ्यास पूर्ण करवून घेतला. सर्व ज्ञान शास्त्र, अस्त्र, शास्त्रादी विद्या शिकवल्या. तथापि संजीवनी अस्त्र आणि वाताकर्षण अस्त्र ही दोन अस्त्रे जालिंदराने राखून ठेवली. त्याचे कारण म्हणजे कानिफाचा जन्म हत्तीच्या कानातून झाला आहे. स्मरण ठेवून डूख धरणे हा हत्तीचा स्वभाव गुणधर्म असतो. तहत सोळा वर्षे हत्तीच्या कानात वास्तव्यास असल्यामुळे हा गुणविशेष कानिफाच्या अंतरंगात उतरला असेल तर? या दोन महास्त्रांचा दुरुपयोग होण्याच्या शंकेमुळे, जालिंदरांनी ती राखून ठेवली. उर्वरित सर्व विद्येत कानिफनाथ पारंगत झाला.

बद्रीनाथ श्रीशंकर म्हणाले, “जालिंदरा! अस्त्र विद्येच्या सर्व देवता कानिफाला प्रसन्न करून दे.” श्रीशिवाची आज्ञा प्रमाण मानून जालिंदराने स्तवनास्त्र जपून सर्व देवतांना पाचारण केले. इंद्र, वरूण, अश्विनी, आतळ, वितळ, सप्त पाताळातील दानव, मानव, नाग कुळातील नऊ मुख्य अधिपती, चंद्र, सूर्य, गण, गंधर्व, यक्ष, किन्नर, ब्रह्म, विष्णू, गरुड, दशरथी राम, हनमंत, विष्णूचे दश अवतार, बावन्न वीर, जलदेवता, शंखिनी, डंखिनी, कालिका, अष्टभैरव, गजानन असे असंख्य देव अवतीर्ण झाले. मृत्युलोकांत तेहतीस कोटी देवसंख्या असल्याचे मानले जाते ते सर्व प्रकट झाले. त्यांना वंदन करून जालिंदर म्हणाले, “हे कृपाळू देवतांनो! कानिफाचा विद्याभ्यास पूर्ण झाला असल्याने आपण सर्वांनी त्याला वरदान देण्याची कृपा करावी.” या विनंतीवरून सर्व देवते नाराज झाली आणि म्हणाली, “मागील वेळेस अग्नीदेवाच्या आणि श्रीदत्तगुरूंच्या शब्दांना मान देऊन, त्यांच्या भिडेखातर आम्ही तुला वरदान दिले. प्रत्येक वेळी तुम्ही वरदान मागत आहात, हा काय प्रकार आहे? आम्ही वर तरी किती वेळा द्यायचा? तुमचा शिष्यपरिवार आणि पंथ दिवसेंदिवस वाढत जाईल तेव्हा दरवेळी आम्ही वर देत बसावे काय? आम्हाला चांगले म्हणा अथवा वाईट म्हणा परंतु आता स्पष्टपणे सांगत आहोत की आम्ही इतऊपर वर देणार नाही.” असे म्हणून सर्व देव आपआपल्या विमानयानांवर स्वार होऊन निघून गेले.

देवांचे हे उपमर्द करणारे वर्तन पाहून जालिंदर अतिशय संतप्त होऊन म्हणाला, "माझा अपमान करून जात आहात काय? आता बघाच माझा पराक्रम!" असे म्हणून त्यांनी गगनात वातास्त्र टाकला, आणि वातास्त्र टाकताच महभयंकर चक्रीवादळ उठून देवांची विमाने त्यांत गरगर फिरू लागली. हे पाहताच गंधर्वांसह इतर देवांनी धनुष्याला प्रात्यांचा लावून त्यावर बाण चढवून शरसंधान करू लागले. जालिंदर त्या सर्वांचे लीलया निराकरण करीत होता. गंधर्वांनी पर्वतास्त्र इंद्राने वज्रास्त्र, यक्षाने अग्नीअस्त्र, वरुणाने जलदास्त्र, अश्विनीने धुम्रास्त्र, दानवांनी नागास्त्र, अशी अनेक प्राणघातक अस्त्रे बाणांच्या अग्राद्वारे जालिंदरावर सोडली. श्रीहरी आणि श्रीहर दूर उभे राहून गमंत पाहत होते.

अग्निपुत्र जालिंदराने सर्व अस्त्रांवर मोहनास्त्र टाकून त्यांना मोहून टाकले (मोहवश केले), परिणाम असा झाला की सर्व अस्त्रे त्याला नमन करून माघारी फिरली. तथापि पर्वतास्त्राच्या प्रभावाने गगनातील चक्रीवादळ थंडावल्याने देवांची विमाने आकाशात सावरली गेली. आणि व्यवस्थितपणे मार्गस्थ झाली. त्यानंतर सर्व देवंनी विचार केला की, आपण सोडलेली सर्व अस्त्रे जालिंदरास शरण जाऊन परत फिरत आहेत. तेव्हा आपण सर्वजण धरणीवर उतरून त्याचाशी द्वंदयुद्ध करून त्याला शस्त्राच्या आघाताने ठार मारु या. सर्वांनी हा विचार पक्का केला आणि तेहतीस कोटी देव पुन्हा धरणीवर उतरले. मुद्गल, फरश, अंकुश बरची, खड्ग, त्रिशूल, भाला, तोमर, गदा, मांडू, कट्यार, चक्र, दारूकायंत्र, गुप्ती अशाप्रकारची प्राणघातक धारदार शस्त्रे पारजत देवांनी चढाई केली.

जती जालिंदराने त्यांच्यावर कामिनी अस्त्र आणि कामास्त्र सोडले. त्यामुळे अप्सारांपेक्षाही असंख्य सुंदर लावण्यवती कामिनी प्रकट झाल्या. कामास्त्रामुळे देवांची काम वासना चाळवली आणि ते युद्ध विसरून त्या रमणींच्या मागे फिरत प्रणयराधना करू लागले. त्या चतुर कामिनींनी कामुक नेत्रकटाक्षांनी आणि हावभावनी देवांना मोहवीत दूरवर नेले. पत्येक देव एकेकीच्या मागे लंपटपणे पळू लागले. त्या रानोमाळ धावू लागल्या देवसुद्धा काट्याकुट्यांची तमा न बाळगता त्यांचा पाठलाग करीत दौडू लागले. बद्रीकावनात बोरी बाभळीसारख्या काटेरी वृक्षांची विपुलताच होती, काट्याकुट्यांतून धावतांना देवांची भरजरी वस्त्रे फाटली, देहावर ओरखडे उठले. त्या स्त्रिया झाडांवर चढल्या. देवांची सेना सुद्धा त्याच्यां मागोमाग झाडावर चढली आणि प्रणयासाठी 'वश हो' म्हणून याचना करू लागली. जालिंदराने त्यांच्यांवर स्पर्शास्त्र मंत्रले दरम्यान मायावी रमणींनी पटापट खाली उड्या मारल्या. मोहवश झालेल्या देवांनीही त्यांच्या मागे उड्या मारण्याचा प्रयत्न केला असता, स्पर्शास्त्राच्या प्रभावाने देवांचे पाय झाडांच्या फांद्यांना चिकटल्याने ते खाली डोके आणि वर पाय अशा उलट्या अवस्थेत लटकले गेले. शिरोभूषणे, सोनेरी मुकुट जमिनीवर अस्ताव्यस्त पडले आहेत. केस मोकळे सुटले आहेत, अशी त्रेधा झाली. सुगरण पक्षाच्या घरट्यांसारखे लटकलेले देव पाहून, त्यांची फजिती पाहून श्रीहरी श्रीहर हसू लागले. "बरी मौज झाली. यांना आजत्यागत कोणी असा बहाद्दूर भेटला नव्हता. बरे झाले! स्वतःच्या क्षमतेची आणि ज्ञानाची परीक्षा करून घेतली." त्या मायावी कामिनींनी सर्व देवतांची वस्त्रे गोळाकरून त्यांचा ढीग जालिंदर जवळ आणून रचला आणि त्या अदृश्य झाल्या. नग्नावस्थेत सर्वच देव झाडांना उलट्या अवस्थेत लटकून राहिले.

गुरु जालिंदराने शिष्य कानिफाला हळूच एक युक्ती सांगितली, त्याप्रमाणे कानिफाने ज्या त्या देवांचे वस्त्र ज्याचे त्याला नेसविले. हे करीत असतांना हळू आवाजात म्हणत होते, "देवा! ही आमच्या गुरूची विपरीत करणी आहे. तुम्ही सामर्थ्यशाली आहात, ब्रह्मांडात कीर्तिमंत आहात. तुमची अशी विटंबना योग्य वाटत नाही. मी गुरूंच्या नकळत तुम्हाला ही वस्त्रे नेसवीत आहे. माझ्यावर दया करा आणि मी तुम्हाला मदत करीत आहे ही बाब माझ्या गुरुदेवांना

कळू देऊ नका. अन्यथा मला शिक्षा होईल.'' असे म्हणून वंदन करीत कानिफाने सर्व देवांना वस्त्रे परिधान करून त्यांचे लज्जारक्षण केले. त्याची भक्ती पाहून देव संतुष्ट झाले. त्या गुरूपेक्षा हा शिष्य समजूतदार आहे, नम्र आहे, असे वाटून देवांनी प्रसन्न होऊन वर दिले. मनात असाही विचार केला की या सत् शिष्याला वर देण्यातच आले हित आहे, अन्यथा तो कोपिष्ट साधू आपल्याला अजिबात सोडणार नाही. अशारितीने कानिफाला सर्व देवांची वर प्राप्ती झाली. हे कानिफाने जालिंदराला सांगताच, त्यांनी विभक्तास्त्र मंत्रून सर्व देवांना मुक्त केले. वस्त्रभूषणे सावरीत, झटकीत, डोक्यावर मुकुट चढवून ते जालिंदरांजवळ येऊन म्हणले, "जालिंदरा! तुझा शिष्य चांगला आहे. आम्ही त्याला वर दिले आहेत. त्याच्या सर्व अस्त्रविद्येस सहाय्य करण्यासाठी आम्ही प्रकट होऊन कार्यपूर्तता करू. आणखी काही बाकी असल्यास आताच सांगावे."

त्यावर जालिंदर म्हणाले, "भविष्यकाळात मी शाबरी काव्यरचना करणार आहे. त्यासाठी तुम्ही सहय्य करण्याची कुपा करावी.''

"अवश्य! जालिंदरा! तथास्तु." असे वचन देऊन सर्व देव स्वस्थानी गेले. त्यानंतर जालिंदरनाथ, कानिफनाथ यांनी श्रीविष्णू आणि श्रीशिव यांच्या सोबत तीन दिवस वास्तव्य करून आतिथ्य उपभोगले.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने देवतांचा कोप शांत होऊन त्यांचा आशीर्वाद प्राप्त होईल.